केंद्र पुरस्कृत “व्याघ्र प्रकल्प” याजेनेअतर्गत राज्यातील व्याघ्र प्रकल्पाच्या विकासात्मक कामाकरीता अनुसूचित जाती उपयोजनेअंतर्गत सन २०२३-२४ मधील उर्वरीत प्रलंबित निधी सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरीत करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशीर्ष २४०६ए ९१७) (आवर्ती खर्च)
राज्य हिस्सा (लेखाशीर्ष ग २४०६ए९२६) (आवर्ती खर्च)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र. ३९ /अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३० मे, २०२४

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
२) महसूल व वन विभागाची नस्ती क्र.डब्ल्यूएलपी १०.२३/प्र.क्र.३१४/फ-१

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत व्याघ्र प्रकल्प या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०६, सर्वसाधारण शिक्षण, ०२, पर्यावरणीय वनीकरण आणि वन्यजीव, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) (०५) व्याघ्र प्रकल्प (०१) (०७) व्याघ्र प्रकल्प (केंद्र हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०६ए९१७ खाली रु.१९४.०० लाख व (०१) (०८)व्याघ्र प्रकल्प (राज्य हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०६ए९१७ खाली रु.१९४.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ दि.०१.०४.२०२४ रोजीच्या परीपत्रकान्वये निधी वितरणासाठी कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र २ येथील महसूल व वन विभागाच्या नस्तीवरील प्रस्तावानुसार अनुसूचित जाती प्रवर्गाकरीता व्याघ्र प्रकल्प योजनेचा सन २०२३-२४ चा उर्वरीत निधी वितरणासाठी लेखाशिर्ष २४०६ ए ९१७ (केंद्र हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.२१.२१३५ लाख आणि लेखाशिर्ष २४०६ए९२६ (राज्य हिस्सा ५०%) (आवर्ती खर्च) (कार्यक्रम) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) मध्ये रु.२१.२१३५ लाख असा मिळून एकूण रु. ४२.४२७० लाख इतका निधी SNA खात्यात जमा करुन खर्च करण्यासाठी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व महसूल व वन विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ४८७/२४/ व्यय १४ दि.०३.०५.२०२४ अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५३०१४५७२७६०२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.05.30 15:10:04 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्रराज्य, नागपूर
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग